**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः प्रतिनि-१०२३/प्र.क्र.८३/का.१४**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ जून, २०२३.

## आदेश

श्री.केशव सदाशिवराव जाधव, अवर सचिव, ग्राम विकास विभाग यांची अतिरिक्त आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर या पदावर खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रथमत: ३ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्री.जाधव हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, श्री.केशव सदाशिवराव जाधव, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, ग्राम विकास विभाग व नगर विकास विभाग यांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्री.जाधव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी ग्राम विकास विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री.जाधव यांना, अतिरिक्त आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर या प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्याकरिता ग्राम विकास विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६०६१३०९२९४३०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.06.06 13:11:26 +05'30'

**(वि.बा.माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्र.स., मंत्रालय, मुंबई-३२
४. अ.मु.स./प्र.स./सचिव, ग्राम विकास विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर.
६. सह/उप सचिव (आस्थापना), ग्राम विकास विभाग/ उप सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. श्री.केशव सदाशिवराव जाधव, अवर सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. (विभागामार्फत)
८. निवडनस्ती कार्यासन-१४.